सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात पुर्नवसन तत्वावरील स्वयंसेवी संस्थांना (कुष्ठरोगा संबंधी) सहायक अनुदान वितरित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०२०/प्र क्र ५०६/आरोग्य -५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ८ व १० वा मजला,मंत्रालय, मुंबई
दिनांक: २० ऑक्टोबर, २०२१.

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग ,शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०११/प्र क्र ३२१/ आरोग्य-५, दि. २१ मार्च, २०१२
२) सार्वजनिक आरोग्य विभाग ,शासन निर्णय क्रमांकः, कुनिका २०२०/प्र क्र ५०६/ आरोग्य-५, दि. २४ मार्च, २०२१
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे, यांचे पत्र क्र.संआसे-२/पुर्नवसन तत्त्व प्रस्ताव/अनुदान/कक्ष/५४९४-९५/२१, दि. २६ मार्च, २०२१

**प्रस्तावना -:**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार पुर्नवसन तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी जास्तीत जास्त रु.२,०००/- प्रमाणे प्रतीरुग्ण अथवा परिरक्षणार्थ खर्चाच्या ८०% यापैकी कमी असेल ती रक्कम याप्रमाणात दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. सन २०२०-२१ या वित्तिय वर्षातील तरतूदीमधील अर्थसंकल्पित तरतूदीच्या ३० टक्के अनुदान म्हणजेच रु. ३,५०,००,०००/- च्या ३० टक्के रु.१,०५,००,०००/-(रु. एक कोटी पाच लाख फक्त) इतके सहायक अनुदान संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले

आहे. तथापि, सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता अर्थसंकल्पित तरतूदीपैकी उर्वरीत निधी पुनर्वसन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

पुनर्वसन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने देण्यासाठी ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.३,५०,००,०००/-(तीन कोटी, पन्नास लक्ष फक्त) इतके सहायक अनुदान (योजनेतर) सन २०२०-२१ या वर्षाकरीता अर्थसंकल्पित करण्यात आले आहे. तथापि, कोरोना काळातील राज्याच्या अर्थव्यवस्थेवरील परिणाम विचारात घेऊन वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४/०६/२०२१ अन्वये करण्यात आलेल्या उपाययोजनेस अनुसरुन सदर मंजूर अनुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे स्वयंसेवी संस्थांना रु.१,९०,६३,४७४/- (रु. एक कोटी नव्वद लाख त्रेसष्ट हजार चारशे चौऱ्याहत्तर फक्त) इतके सहायक अनुदानास दिनांक २१ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| क्र | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान (रुपयांत) |
|---|---|---|---|---|
| १ | महारोगी सेवा समिती, आनंदवन, वरोरा, जिचंद्रपूर. | ऑक्टोबर, २०१९ ते सप्टेंबर, २०२० | ७२०० | १,४४,००,०००/- |
| २ | कुष्ठरोग पुनर्वसन केंद्र गोरापूर, वडाळा मिशन, ता. नेवासा, जि. अहमदनगर | जानेवारी, २०२० ते जून, २०२० | ७८ | १,४३,९०४/- |
| ३ | महारोगी आश्रम, काशीखेड, ता.धामणगांव जि ल्हा अमरावती | जानेवारी, २०२० ते सप्टेंबर, २०२० | ११७ | २,२८,४७८/- |
| ४ | विदर्भ महारोगी सेवा मंडळ तपोवन, जि. अमरावती | ऑक्टोबर, २०१९ ते सप्टेंबर, २०२० | १४५४ | २८,९६,१२८/- |
| ५ | आनंदग्राम सोसायटी, डुडुळगांव, आळंदी,ता. हवेली, जिल्हा, पुणे | ऑक्टोबर, २०१९ ते जून, २०२० | ६० | १,१८,४५१/- |
| ६ | महारोगी सेवा समिती दत्तपूर वर्धा | ऑक्टोबर, २०१९ ते जून, २०२० | ४४४ | ८,७६,३६२/- |

| क्र | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान (रुपयांत) |
|---|---|---|---|---|
| ७ | कुष्ठरोग निवारण समिती, शांतीवन, नेरे, जिल्हा रायगड | जानेवारी, २०२० ते जून, २०२० | २४० | ४,००,१५१/- |
| | **एकूण** | | **९,५९३** | **रु.१,९०,६३,४७४ /-** |

३. सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात पुनर्वसन तत्त्वावर स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरणाचा प्रस्ताव, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२० निधी वितरणाबाबत वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०सोबतच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.९ समोर नमूद तपासणी सूचीतील क्र.१ ते १० मधील सर्व अटींची पूर्तता केली असल्याचे प्रमाणपत्र सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षय रोग) यांनी सादर केले आहे. तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि. १६ एप्रिल, २०२० अन्वये दिलेल्या सुचनांनुसार, सन २०१९-२० या वित्तिय वर्षात पुर्नवसन तत्त्वावर स्वयंसेवी संस्थांना यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे संबंधीत संस्थांच्या उपयोगिता प्रमाणपत्र संचालनालयाने सादर केले आहे.

४. सहसंचालक (कुष्ठ व क्षय), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले असून त्यांनी वरील अटी पुर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी. तसेच सदर अनुदानाशी संबंधित देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करणेसाठी सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये व खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

५. याबाबतचा खर्च सन २०२०-२१ या वर्षाकरीता मागणी क्रमांक आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(१८) कुष्ठरोग मुक्त झालेल्या रोग्यांना पुनर्वसनासाठी सहायक अनुदान (२२१० ०७४५) या लेखाशिर्षाखाली ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२०-२१ या वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२० अन्वये त्या विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून, तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ४४२/२०२१/व्यय-१३, दि. १४/०९/२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११००८१७२७०७७८१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, pseudonym=EFE0AAA7FB78AD706283B7A34C5FC48C1920AEBD, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2021.10.21 12:31:08 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत-

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.
२) आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य भवन मुंबई.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई
७) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे
८) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
९) वित्त विभाग, (व्यय.१३) मंत्रालय, मुंबई.
१०) सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-५)